शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, मिरज येथील भुयारी गटार योजनेच्या बांधकाम अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग,
शासन निर्णय, क्रमांक : जीसीएम-२०२२/प्र.क्र.३६९/प्रशा-१,
गोकुलदास तेजपाल रुग्णालय आवार, नवीन मंत्रालय,
गोकुलदास तेजपाल संकुल, ९ वा मजला,
लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई -४०० ००१.
दिनांक : २१ ऑगस्ट, २०२४

**वाचा :**

१) वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, शासन निर्णय क्रमांक : जीसीएम-२०२२/प्र.क्र.३६९/प्रशा-१, दिनांक १३.०२.२०२३

२) आयुक्त, वैद्यकीय शिक्षण व आयुष, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्रमांक : संवैशिवसं/मिरज/भुयारी गटार सुधारीत प्र.मा./११२३८/आय-प/२४, दिनांक १०.०७.२०२४

**प्रस्तावना :**

विभागाच्या शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, मिरज येथील भुयारी गटार योजनेच्या कामास दिनांक १३.०२.२०२३ च्या शासन निर्णयान्वये रुपये ११.२० कोटी इतक्या रक्कमेच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आलेली होती. भुयारी गटार योजनेच्या जी.एस.टी. मधील बदल, ईटीपी चार्जेस व दरसूचीतील बचत यामुळे प्रशासकीय मंजूरी किंमतीपेक्षा प्रस्तावामध्ये ४० ते ५० टक्क्यापर्यंत वाढ झाल्याकारणाने संदर्भ क्र.०१ येथील प्रशासकीय मान्यता रद्द करुन नव्याने बांधकाम अंदाजपत्रकास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

विभागाच्या नियंत्रणाखालील शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, मिरज येथील भुयारी गटार योजनेच्या जी.एस.टी. मधील बदल, ईटीपी चार्जेस व दरसूचीतील बचत यामुळे प्रशासकीय मंजूरी किंमतीपेक्षा ४० ते ५० टक्क्यापर्यंत वाढ झाल्याकारणाने तसेच सदर काम अद्याप सुरु न झाल्याने सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्याऐवजी मूळ प्रशसकीय मान्यता रद्द करुन नव्याने प्रशासकीय मान्यता देण्याबाबत सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अभिप्रायानुसार संदर्भ क्र.०१ येथील प्रशासकीय मान्यता रद्द करुन नव्याने बांधकाम करण्यासाठी रुपये १४,५१,७८,२००/- (रुपये चौदा कोटी, एकावन्न लक्ष, अठ्ठ्याहत्तर हजार, दोनशे फक्त) इतक्या रक्कमेच्या नवीन बांधकाम अंदाजपत्रकास पुढील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

| अ.क्र. | कामाचे नाव | अदांजित किंमत |
|---|---|---|
| १ | Underground Drainage Scheme for Government Medical College and Residential Staff Quarters Campus, Miraj Tal-Mirag, Dist-Sangli. | १४,५१,७८,२०० |
| | एकूण | १४,५१,७८,२०० |

**अटी :-**

१) सदर काम करण्यापूर्वी जागेच्या मालकी हक्काबाबत पुर्तता करण्यात यावी.

२) प्रस्तुत काम पुरातत्व विभागाच्या अखत्यारित येत असल्यास संबंधित विभागाची तसेच महानगरपालिका व तत्सम प्राधिकरणे यांची पूर्व परवानगी घेण्यात यावी.

३) तांत्रिक मंजूरी देताना राज्य दरसूचीबाह्य बाबींच्या दराकरीता शासन परिपत्रक क्रमांक - २०१७/प्र.क्र११/नियोजन-३, दिनांक ११.०४.२०१७ नुसार कार्यवाही करण्यात यावी.

४) प्रस्तावातील खरेदीशी संबंधित बाबींकरीता ई-निविदा प्रणालीचा अवलंब करुन उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाकडील दिनांक २४.०८.२०१७ च्या शासन निर्णयान्वये निर्गमित केलेल्या सूचना विचारात घ्याव्यात.

५) प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय, इएनव्ही-२०१३/प्र.क्र.१७७/ तां.क्र.१, दिनांक १० जानेवारी, २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वानुसार कार्यवाही करण्यात यावी.

६) स्थापत्य कामाच्या कालावधीतच विद्युतीकरणाबाबत तसेच इतर अनुषंगिक कामांचे योग्य नियोजन करुन सदर कामे पूर्ण करावीत.

७) इमारतीमध्ये दिव्यांगाकरीता उपलब्ध करुन द्यावयाच्या विविध सोयीबाबत शासनाने वेळोवेळी दिलेल्या सूचनांच्या अनुषंगाने कार्यवाही करण्यात यावी.

८) विषयांकित कामाकरीता सुधारीत प्रशासकीय मान्यतेची आवश्यकता लागणार नाही, यादृष्टीने विशेष दक्षता घेऊन काम करण्यात यावे.

२. प्रस्तुत बांधकामासाठी येणारा खर्च खालील लेखाशीर्षात मंजूर होणा-या निधीतून भागविण्यात यावा.

मागणी क्रमांक - एच-०८
४२१० - वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य यावरील भांडवली खर्च
०३, वैद्यकीय शिक्षण, प्रशिक्षण व संशोधन
१०५-विषमचिकित्सा पंचवार्षिक योजनांतर्गत
(४२१० ००४१) ५३- मोठी बांधकामे

३. सदर शासन निर्णय, वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक : विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/ विनियम, भाग-२, दिनांक २०.०९.२०१९ मधील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका-१९७८, भाग-१, उप विभाग-५, अनुक्रमांक-१, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियमपुस्तिकेतील परिच्छेद क्रमांक १३४ (१) नुसार प्रशासकीय विभागाला प्रदान केलेल्या वित्तीय अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०८२११४४६५४४६१३ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SUDHIR JAYA SHETTY

Digitally signed by SUDHIR JAYA SHETTY
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MEDICAL EDUCATION AND DRUGS DEPARTMENT, 2.5.4.20=72ea277025fdf5a4898b244953b82406eea05963bc456f1e1e8621e5917d8305, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=E9D37D499A521B728AEB3DC8EC38B759420308B9FD7816002B4AF0FFBF1111D7, cn=SUDHIR JAYA SHETTY
Date: 2024.08.15 23:14:30 +05'30'

**(सुधीर जया शेट्टी)**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,

१. आयुक्त (वै.शि.), वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई
२. महालेखापाल-१/२ (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर
३. संचालक, वैद्यकीय शिक्षण आणि संशोधन, मुंबई.
४. मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, पुणे विभाग, पुणे.
५. अधिष्ठाता, शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, मिरज
६. कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, सांगली
७. जिल्हा कोषागार अधिकारी, सांगली
८. निवडनस्ती (प्रशा-१).